**महाराष्ट्र माजी सैनिक महामंडळातर्फे (मेस्को) विविध आस्थापनांना पुरविण्यात येणाऱ्या सुरक्षा रक्षक व अन्य संवर्गातील कर्मचाऱ्यांचे वेतनदर, भत्ते, लेव्हिज आणि अटी व शर्ती निर्धारित तसेच पुनर्निर्धारित करण्याचे अधिकार, महाराष्ट्र माजी सैनिक महामंडळाच्या समितीस देणेबाबत**

**महाराष्ट्र शासन**

**सामान्य प्रशासन विभाग**

**शासन निर्णय क्रमांकः मेस्को-२०१४/(प्र.क्र.३४०/१४)/२८**

मादाम कामा मार्ग, शहीद राजगुरु चौक

मंत्रालय, मुंबई-४०००३२

तारीख: ०७ मार्च, २०१५

**वाचा :**

१) शासन निर्णय क्रमांकः मासैम-१०९९/२३९०/प्र.क्र. २४४/९९/२८, दि. १८/०१/२००२.

२) शासन निर्णय क्रमांकः मासंग-१०१९/२३९०/प्र.क्र.२४४/९९/२८, दि. १४/११/२००२.

३) शासन निर्णय क्रमांकः मासैनो-२००५/६२२/प्र.क्र.११९/का.२८, दि. ११/०६/२०१०.

**प्रस्तावना :**

महाराष्ट्र राज्यातील, सैन्यदलातून निवृत्त झालेल्या माजी सैनिकांना रोजगाराच्या संधी उपलब्ध व्हाव्यात तसेच त्यांच्यासाठी असलेल्या विविध योजनांची अंमलबजावणी अधिक परिणामकारकपणे करण्याकरिता, महाराष्ट्र माजी सैनिक महामंडळाची (मेस्को) स्थापना करण्यात आली आहे. या महामंडळामार्फत सुरक्षा सेवा व इतर व्यवसायांमध्ये कंत्राटी पध्दतीने माजी सैनिकांच्या सेवा पुरविल्या जातात. या सर्व संवर्गातील माजी सैनिकांचे वेतनदर, भत्ते,लेव्हीज, अटी व शर्ती निर्धारित करण्याचे अधिकार महामंडळाच्या अधिकाऱ्यांचा समावेश असलेल्या समितीस प्रदान करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. या अनुषंगाने शासन पुढीलप्रमाणे निर्णय घेत आहे.

**शासन निर्णय:**

१) महाराष्ट्र माजी सैनिक महामंडळाव्दारे सुरक्षा सेवा व इतर व्यवसायामध्ये, ज्या माजी सैनिकांना कंत्राटी पद्धतीने नियुक्त केले जाते, त्या माजी सैनिकांचे वेतन दर, भत्ते, लेव्हीज आणि अटी व शर्ती निर्धारित करण्याचे तसेच ते वेळोवेळी पुनर्निर्धारित करण्याचे अधिकार, महाराष्ट्र माजी सैनिक महामंडळाच्या (MESCO) समितीस प्रदान करण्यात येत आहेत. सदर समितीचे अध्यक्ष हे व्यवस्थापकीय संचालक, मेस्को असतील तसेच या समितीमध्ये मेस्कोचे महाव्यवस्थापक व वरिष्ठ व्यवस्थापक (कार्मिक व प्रशासन) हे सदस्य असतील.

२) किमान वेतन अधिनियम, १९४८ मधील तरतुदी व महासंचालक (पुनर्वास), संरक्षण मंत्रालय, नवी दिल्ली यांनी सुरक्षा रक्षकांसाठी वेळोवेळी निर्धारित केलेले दर तसेच त्यासंबंधीच्या अटी व शर्ती विचारात घेऊन माजी सैनिकांचे वेतन, भत्ते व लेव्हीज निर्धारित किंवा पुनर्निर्धारित करण्याबाबतचा निर्णय सदर समिती घेईल.

३) उक्त नमूद बाबींवरील निर्णय बहुमताने (by majority) घेण्यात येईल.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०३०७१७४३४४२६०७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Pradeep Darade

Digitally signed by Pradeep Darade
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Under Secretary, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Pradeep Darade
Date: 2015.03.07 17:52:29 +05'30'

(प्र.ल.दराडे)
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. राज्यपाल यांचे सचिव,
२. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, सर्व मंत्री, राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव / स्वीय सहायक,
३. मुख्य सचिव,
४. शासनाचे सर्व अपर मुख्य सचिव, प्रधान सचिव, सचिव,
५. सर्व विभागीय आयुक्त,
६. सर्व जिल्हाधिकारी,
७. संचालक, सैनिक कल्याण विभाग, राष्टीय युध्द स्मारकासमोर, सोलापूर रोड, घोरपडी, पुणे - ४११ ००१,
८. व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र माजी सैनिक महामंडळ (मेस्को), घोरपडी, पुणे,
९. महाव्यवस्थापक, महाराष्ट्र माजी सैनिक महामंडळ (मेस्को), घोरपडी, पुणे,
१०. वरिष्ठ व्यवस्थापक (कार्मिक व प्रशासन), महाराष्ट्र माजी सैनिक महामंडळ (मेस्को), घोरपडी, पुणे,
११. सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी,

१२. *प्रबंधक, उच्च न्यायालय, अपील शाखा/मूळ शाखा, मुंबई,

१३. *प्रबंधक, लोकायुक्त व उप लाकायुक्त यांचे कार्यालय, मुंबई,

१४. *आयुक्त, राज्य निवडणूक आयोग, मुंबई,

१५. *सचिव, महाराष्ट्र विधान मंडळ सचिवालय, मुंबई,

१६. *सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई,

१७. महालेखापाल, महाराष्ट्र - १, मुंबई,

१८. महालेखापाल, महाराष्ट्र - २, नागपूर,

१९. अधिदान व लेखा अधिकारी, महाराष्ट्र, मुंबई,

२०. सर्व जिल्हा सैनिक कल्याण अधिकारी, जिल्हा सैनिक कल्याण कार्यालय,

२१. माहिती व जनसंपर्क महासंचालक (प्रसिध्दी पत्रक काढण्याच्या विनंतीसह),

२२. मंत्रालयीन विभागाच्या अधिपत्याखालील सर्व विभागाध्यक्ष आणि कार्यालय प्रमुख,

२३. सर्व मंत्रालयीन विभाग,

२४. सामान्य प्रशासन विभागातील सर्व कार्यासने,

२५. निवड नस्ती (२ प्रती).

* पत्राने